**डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला येथील रोजंदारी मजुरांना समान काम समान वेतनाच्या अनुषंगाने थकबाकीची रक्कम देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक न्यायप्र-१६१८/प्र.क्र.१५१/६-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,विस्तार,मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० मार्च, २०२५.

**वाचा** :- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्रमांक न्यायप्र-१६१८/प्र.क्र.१५१/६-अे, दि.२३.१०.२०२०.
२. कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र दि.१८.०९.२०२०.
३. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट याचिका क्र.२२२२/२००२, २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ मधील न्यायनिर्णय दि.१५.०२.२०१९.
४. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे अवमान याचिका क्र.४३/२०२०, ४६/२०२०, १७२/२०२० व १७५/२०२० मधील आदेश दि.१३.०२.२०२५.

**प्रस्तावना :-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील रोजंदारी मजुरांच्या बाबतीत समान काम व समान वेतनाच्या अनुषंगाने थकबाकी मिळण्याबाबत मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.२२२२/२००२ , २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ दाखल करण्यात आल्या होत्या. त्यामध्ये दि.१५.०२.२०१९ रोजी सामायिक निर्णय (Common decision) देताना मा.उच्च न्यायालयाने पुढीलप्रमाणे नमूद केले-

**" In this view of the matter, and the principle of equal pay for equal work , we are of the considered opinion that the petitioner are entitled to the benefit of the directions issued by the Hon'ble Supreme Court dated 24.7.2001 in Civil Appeal 8646 to 8659 of 1997, and we order accordingly. The respondents shall work out and pay to the petitioners the financial benefits payable to the petitioners before 30.09.2019 "**

२. कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे वाचा क्र.२ येथील पत्रान्वये, रिट याचिका क्र.२२२२/२००२ , २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ मधील मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने रोजंदारी फरकाची रक्कम देण्यासाठी, रू.९.७७ कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली होती.

**३.** मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना, कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने, सन १९८५ ते २००१ या कालावधीतील रोजंदारी फरकाची रक्कम देण्यासाठी, रू.२.६० कोटी एवढा निधी, वाचा क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे यापुर्वी उपलब्ध करून देण्यात आला आहे.

**४.** मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील रिट याचिका क्र.२२२२/२००२ , २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ मधील दि.१५.०२.२०१९ च्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी न झाल्याने रिट याचिका क्र.२१९/२००५ मध्ये अवमान याचिका क्र.१७५/२०२०, रिट याचिका क्र.२२२२/२००२ मध्ये अवमान याचिका क्र.१७२/२०२०, रिट याचिका क्र.४८५२/२००४ मध्ये अवमान याचिका क्र.४३/२०२०, रिट याचिका क्र.१३४६/२००४ मध्ये अवमान याचिका क्र.४६/२०२० मा.उच्च न्यायालयात दाखल झाल्या आहेत.

**५.** त्यानुषंगाने, मा.उच्च न्यायालयाच्या दि.१५.०२.२०१९ रोजीच्या आदेशानुसार, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने रोजंदारी फरकाची रक्कम देण्याबाबत, कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे वाचा क्र.२ येथील पत्रान्वये, मागणी केल्यानुसार निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मा.उच्च न्यायालय,मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.२२२२/२००२ , २१९/२००५, १३४६/२००४, ४८५२/२००४ व ४२८६/२००३ मध्ये दि.१५.०२.२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला येथील याचिकाकर्त्या रोजंदारी मजुरांना कायम कामगारांच्या वेतनाच्या १/३० दराने रोजंदारी फरकाची रक्कम देण्यासाठी, कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांनी मागणी केल्यानुसार, रू.९.७७ कोटी इतक्या रकमेतून, वाचा क्र.१ वरील, शासन निर्णय दि.२३.१०.२०२० अन्वये देण्यात आलेल्या रू.२.६० कोटी इतक्या निधी व्यतिरिक्त, उर्वरित **रु.७.१७ कोटी (रुपये सात कोटी, सतरा लाख फक्त)** इतका निधी या शासन निर्णयाद्वारे डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठास उपलब्ध करून देण्यात येत आहे.

**२.** याबाबत होणारा खर्च मागणी क्र.डी-३, ०१ पीक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०३) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान(अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) (२४१५ ००४३) या लेखाशिर्षांतर्गत चालू वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा. आहरण व संवितरण अधिकारी/ सहाय्यक लेखाधिकारी यांनी सदरचा निधी नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांना अदा करण्याबाबतची कार्यवाही करावी.

**३.** सदर प्रकरणी रोजंदारी मजुरांना समान काम समान वेतनानुसार देय असलेल्या रकमेची योग्य पडताळणी करून देय फरकाची रक्कम ही पात्र याचिकाकर्त्यांनाच देण्यात यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी ही विद्यापीठ स्तरावरील संबंधित अधिका-यांची असेल.

**४.** पात्र याचिकाकर्त्यांना थकबाकी देण्याकरिता ग्राह्य कालावधी, थकबाकीची देण्यात आलेली रक्कम इ.बाबतचा याचिकाकर्ता तपशीलनिहाय अहवाल शासनास कृषि विद्यापीठ स्तरावरून सादर करण्यात यावा. तसेच, सदर निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

**५.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक - ९७/२०२५/व्यय-१, दिनांक १२ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून सांकेतांक २०२५०३२०१०२९४०७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.03.20 10:31:37 +05'30'

**(प्रतिभा पाटील)**
**उप सचिव**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव , मंत्रालय मुंबई ३२.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई ३२.
३. कुलगुरू/ कुलसचिव/ नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
४. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
६. वित्त विभाग(अर्थसंकल्प शाखा-२/व्यय-१), मंत्रालय, मुंबई-३२.
७. कार्यासन २-अे (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती(६-अे)